**संजय गांधी निराधार अनुदान योजना समितीच्या फक्त अध्यक्षांचीच नियुक्ती झाली असल्यास विशेष सहाय्य कार्यक्रमांतर्गत विविध योजनांमधील लाभार्थ्यांचे अर्ज मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : विसयो-२०१५/प्र.क्र.२५७/विसयो-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय विस्तार इमारत, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : १७ ऑगस्ट, २०१५.

वाचा :-

१) शासन निर्णय,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक : विसयो-२०१०/ प्र.क्र.१७५/ विसयो-२, दि.२६ ऑक्टोबर, २०१०

२) शासन निर्णय,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक : विसयो-२०१०/ प्र.क्र.१२७/ विसयो-२, दि.३१ ऑक्टोबर, २०११

३) शासन निर्णय,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक : विसयो-२०१३/ प्र.क्र.२०६/ विसयो-२, दि.२१ जानेवारी,२०१४

४) शासन निर्णय,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक : विसयो-२०१५/ प्र.क्र.१०५/ विसयो-२, दि.०५ मे,२०१५

प्रस्तावना :-

राज्यातील निराधार वृध्द व्यक्ती, अंध, अपंग, शारिरीक व मानसिक व आजाराने रोगग्रस्त व्यक्ती, निराधार विधवा, देवदासी, परित्यक्त्या इ. दुर्बल घटकांना विशेष सहाय्य कार्यक्रामांतर्गत विविध योजनांमधून मासिक अर्थसहाय्य देण्यात येते. या योजनांमधील लाभार्थ्यांचे अर्ज तालुका स्तरावरील संजय गांधी योजना समितीमार्फत मंजूर करण्यात येतात. शासनाने दि.२७.०७.२०१५ रोजी आयोजित केलेल्या व्हिडीओ कॉन्फरन्समध्ये क्षेत्रीय पातळीवर अधिका-यांनी अशी बाब शासनाच्या निदर्शनास आणून दिली आहे की, ज्या ठिकाणी संजय गांधी निराधार अनुदान योजना समितीच्या अध्यक्षांची नेमणूक झालेली आहे. तथापि, कोणत्याही सदस्यांची नेमणूक झालेली नाही. अशा वेळी या समितीची बैठक आयोजित करावी किंवा कसे याबाबत संभ्रम आहे. या संदर्भात सर्व क्षेत्रीय कार्यालयांना निर्देश देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

विशेष सहाय्य कार्यक्रमातील लाभार्थी निराधार व दुर्बल घटकातील आहेत. या लाभार्थ्यांच्या अर्जांवर वेळेत निर्णय घेणे आवश्यक आहे. याचा विचार करुन शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :-

ज्या तालुक्यांमध्ये संजय गांधी निराधार अनुदान योजना समितीच्या फक्त अध्यक्षांची नियुक्ती झालेली आहे, परंतु अन्य एकाही अशासकीय सदस्यांची नियुक्ती झालेली नाही, अशाप्रसंगी अध्यक्ष व शासकीय सदस्य यांची समिती अस्तित्वात येईल. या समितीने नियमानुसार बैठका आयोजित कराव्यात व लाभार्थ्यांच्या अर्जांवर निर्णय घ्यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८१७१३०८०१२८२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan K Wagh

Digitally signed by Gajanan K Wagh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Gajanan K Wagh
Date: 2015.08.17 13:11:40 +05'30'

(ग.कि. वाघ)

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव,
२) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
४) सर्व जिल्हयांचे पालकमंत्री,
५) सर्व मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६) सर्व जिल्हापरिषदांचे अध्यक्ष
७) सचिव, ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार, कृषि भवन, नवी दिल्ली,
८) अप्पर मुख्य सचिव,
९) महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)१/२, मुंबई/नागपूर, महाराष्ट्र राज्य,
१०) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई,

११) संचालक, नागरी प्रशासन, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई,

१२) सर्व मंत्रालयीन विभाग,

१३) सर्व विभागीय आयुक्त (महसूल)

१४) सर्व महापालिका आयुक्त,

१५) सर्व जिल्हाधिकारी,

१६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद (सर्व),

१७) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,

१८) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,

१९) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई

२०) सर्व उप विभागीय अधिकारी, उपजिल्हाधिकारी (प्रांत अधिकारी), सर्व तहसिलदार/ सर्व नायब तहसिलदार (संगायो),

२१) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,

२२) सर्व नगरपालिकांचे मुख्याधिकारी

२३) सर्व सह सचिव/उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय, मुंबई.

२४) निवड नस्ती/ विसयो-२